**जनजाती क्षेत्र उपयोजना/जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना**
**जून,२००९ अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पात समाविष्ट करण्यात आलेल्या "कामगार व कामगार कल्याण " उपशिर्षाखालील योजनांतर्गत जिल्हास्तरीय तरतूदीचे वाटप.....**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-२००९/प्र.क्र.९/का.६**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १६ फेब्रुवारी, २०१०.**

वाचा : १) वित्त विभागाचे क्र.पूरक १०.०९/प्र.क्र.१५२/अर्थ-३, दि.३० जून,२००९.
२) विभागाचा शासन निर्णय क्र.टिएसपी २००८/प्र.क्र.६/का.६, दि.१६ डिसेंबर,२००९.
३) नियोजन विभागाचा शासन निर्णय क्र.जिवायो १००७/प्र.क्र.३९/का-१४४४, दि.१६.२.२००८.

**शासन निर्णय :** वर नमूद केलेल्या विभागाच्या दिनांक १६ डिसेंबर,२००९ च्या शासन निर्णयाद्वारे आदिवासी उपयोजनेंतर्गत जिल्हा नियोजन समितीने प्रस्तावित केलेला नियतव्यय अर्थसंकल्पित करणे, वितरित करणे व त्यामधील कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत सुधारित आदेश निर्गमित करण्यात आले आहे. त्यानुसार सन २००९-१० या चालू आर्थिक वर्षापासून व सन २००९-१० या चालू आर्थिक वर्षाच्या उर्वरित कालावधीसाठी केलेली तरतूद जिल्हाधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. आता विभागाच्या दिनांक १६ डिसेंबर,२००९ च्या शासन निर्णयानुसार तरतूद वितरीत करण्याची कार्यवाही करावी. तसेच नियोजन विभागाच्या वर नमूद केलेल्या दिनांक १६.२.२००८ च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार प्रशासकीय मान्यतेचे अधिकार नियोजन विभागाने ठरवून दिलेल्या प्रचलित पध्दतीप्रमाणे कायम राहतील. लेखाशिर्ष तसेच उप लेखाशिर्ष निहाय झालेल्या खर्चाची व साध्य झालेल्या भौतिक उद्दिष्टांची माहिती प्रत्येक महिन्यात १० तारखेपूर्वी विभागीय आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांना पाठवावीत.

२. जिल्हा अधिकारी / नियंत्रक अधिका-यांनी त्यांच्या अधिनस्त ठेवण्यात आलेल्या तरतूदीचे तात्काळ विभागनिहाय / जिल्हानिहाय व यंत्रणानिहाय वाटप करुन ती तरतूद संबंधित विभागाचे अंमलबजावणी अधिका-यांच्या अधिनस्त ठेवून त्या विभागास व आदिवासी विकास विभागास कळवावे. तसेच पुरवणी मागणी ज्या योजनेसाठी घेण्यात आली आहे त्याच योजनेवर खर्च होईल याची नियंत्रक अधिका-यांनी दक्षता घ्यावी. याबाबत झालेल्या कोणत्याही अनियमिततेस ते व्यक्तिशः जबाबदार राहतील. पुरवणी मागणीच्या तरतूदी या शासन निर्णयान्वये नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहेत. या शासन निर्णयाद्वारे यासर्व तरतूदी खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर तरतूदी संगणक वितरण प्रणालीद्वारे संबंधितांना उपलब्ध करुन देण्यात येतील.

३. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच जनजाती क्षेत्राबाहेरील केलेली तरतूद त्याच क्षेत्रासाठी खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेत केलेली तरतूद खर्च झाली नाही तर सदर तरतूद प्रत्यार्पित करावी व कोणत्याही परिस्थितीत आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च करण्यात येऊ नये. जर आदिवासी उपयोजनेची तरतूद आदिवासी

क्षेत्राबाहेर खर्च झालेली आढळल्यास याबाबत जिल्हाधिकारी / नियोजन अधिकारी व संबंधित विभागाचे अधिकारी यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्ष निहाय / उप लेखाशिर्ष निहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट निहाय माहिती वर नमूद केलेल्या संबंधित अधिकारी व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्यात १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२०१००२१६१८४३४९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

श. र. सावंत
१६/२/१०

**( श. र. सावंत )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
जिल्हाधिकारी नाशिक, नंदूरबार, जळगांव, पुणे ,अमरावती, गडचिरोली
जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास मंडळ,नाशिक, नंदूरबार, जळगांव, पुणे ,अमरावती, गडचिरोली
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक, नंदूरबार, जळगांव, पुणे ,अमरावती, गडचिरोली
जिल्हा कोषागार अधिकारी,नाशिक, नंदूरबार, जळगांव, पुणे ,अमरावती, गडचिरोली
मुख्य लेखा व वित्तीय अधिकारी, जिल्हा परिषद,नाशिक, नंदूरबार, जळगांव, पुणे ,अमरावती, गडचिरोली
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व)
महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.(प्रत्येकी ३ प्रती)
उच्च व तंत्र शिक्षण विभाग/ वित्त विभाग/ नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(अर्थ-१)
सर्व अधिकारी / कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई
निवड नस्ती (का-६)

**जनजाती क्षेत्र उपयोजनेखालील २००९-१० चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतुदीचे वाटप**
**पूरक मागणी बाब क्र.३२६** **(रुपये हजारात )**

| **शिर्ष :-** कामगार व सेवायोजन<br>**योजनेचे नाव :-** औद्योगिक प्रशिक्षण संस्थांसाठी कार्यशाळा, प्रशासकिय इमारत, वसतीगृह व कर्मचारी निवासस्थाने बांधकाम<br>**(जिल्हास्तरीय)**<br>**(रुपये हजारात )** | | **मागणी क्रमांक :-** टी-६<br>**मुख्य लेखाशिर्ष :-** ४२५०- इतर सामाजिक सेवांवरील भांडवली खर्च- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०१) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांसाठी इमारती बांधणे<br>**(४२५० ००५२)** ५३-मोठी बांधकामे | | |
|---|---|---|---|---|
| **जिल्हयाचे नाव** | **२००९-१० साठी केलेली तरतुद** | **२००९-१० ची अर्थसंकल्पीय तरतुद सुपुर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी** | **प्रशासकीय विभाग** | **शेरा** |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| नाशिक | १०९३९ | संबंधित जिल्हाधिकारी | उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | |
| नंदूरबार | १८९२१ | | | |
| जळगांव | ६७० | | | |
| पुणे | ३११५ | | | |
| अमरावती | २०११ | | | |
| गडचिरोली | १५२८५ | | | |
| **एकुण एकत्रित** | **५०९४१** | | | |

टीप : बांधकामावरील टक्केवारी खर्च वगळण्यात आला आहे.